**सन २०२३-२४ चे क्रांतीज्योती सावित्रीमाई फुले राज्य शिक्षक गुणगौरव पुरस्कार प्रदान करण्यासाठीच्या सत्कार समारंभाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीटीसी-२०२४/प्र.क्र.४७(अ)/टीएनटी-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ जुलै, २०२४

वाचा :-

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीटीसी-२०२२/प्र.क्र.३४/ टीएनटी-४, दिनांक २८ जून, २०२२
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.शिसं/राशिपु/समारंभ/२०२३-२४/विद्या/ए-२/३९५०, दिनांक १९ जुलै, २०२४.

**प्रस्तावना :-**

समाजाची नि:स्वार्थ भावाने आणि निष्ठेने सेवा करणाऱ्या व शैक्षणिक क्षेत्रात अतिउत्कृष्ट काम करणाऱ्या शिक्षकांना त्यांच्या अंगिकृत कामात प्रोत्साहन देण्याच्या व त्यांच्या गुणांचा यथोचित सन्मान करण्याच्या उद्देशाने दिनांक २८ जून, २०२२ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व निकषांनुसार राज्यातील १०९ शिक्षकांना क्रांतीज्योती सावित्रीमाई फुले राज्य शिक्षक गुणगौरव पुरस्काराने गौरविण्यात येणार आहे. सदर पुरस्कार वितरण करण्यासाठीचा समारंभ दि.०५ सप्टेंबर, २०२४ रोजी घेण्यात येणार आहे. सदर पुरस्कार समारंभासाठी लागणाऱ्या रु.२,०८,९५,७००/- (रु.दोन कोटी आठ लाख पंच्याण्णव हजार सातशे फक्त) इतक्या अंदाजित खर्चाचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक १९ जुलै, २०२४ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर पुरस्कार समारंभासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

क्रांतीज्योती सावित्रीमाई फुले राज्य शिक्षक गुणगौरव पुरस्कार या योजनेअंतर्गत सन २०२४-२५ करिता खालील लेखाशिर्षांपुढे नमुद केलेल्या तरतूदीमधील **रु.२,०८,९५,७००/- (रु.दोन कोटी आठ लाख पंच्याण्णव हजार सातशे फक्त)** इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. यावरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षामध्ये केलेल्यास तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा.

| अ.क्र. १. | लेखाशिर्ष व मागणी क्रमांक २. | मंजूर तरतूद (रु.हजारात) ३. | मंजूर प्रशासकीय मान्यता (रू.हजारात) ४. |
|---|---|---|---|
| १. | "मागणी क्र.ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०,सर्वसाधारण,८००,इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (०१) आदर्श शिक्षकांना पुरस्कार (दत्तमत) (२२०२२२९२)" | २०००० | २०००० |
| २. | "मागणी क्र.ई-२,२२०२,सर्वसाधारण शिक्षण, ८०,सर्वसाधारण,८००,इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (४६) आदिवासी क्षेत्रातील उत्कृष्ट कामासाठी शिक्षकांना राज्य पुरस्कार (२२०२३६८२)" | ५०० | ५०० |
| ३. | "मागणी क्र.ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०,सर्वसाधारण,८००,इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (०३) आदर्श स्त्री शिक्षिका पुरस्कार (२२०२२८८२)" | ४०० | ३९५.७ |
| | **एकूण** | **२०९००** | **२०८९५.७** |

३. सदर प्रशासकीय मान्यता वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग ३, अनुक्रमांक ४,२७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७२९११५४४८४९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SIDDHESHWAR KISAN SAPKAL

Digitally signed by SIDDHESHWAR KISAN SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=db42cf8a91b869b103e6e107753b6bb34fc469e07c99e0703ba8560eaca00b19, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=80124DE9F22650026F4F18C12640F0BA35AB131CAEE127F00EE6CD16619FE883, cn=SIDDHESHWAR KISAN SAPKAL
Date: 2024.07.29 12:09:59 +05'30'

( सिद्धेश्वर सपकाळ )

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.

३) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई /नागपूर.

५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

६) अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई .

७) वित्त विभाग, व्यय - ५ /विनियम, मंत्रालय, मुंबई.

८) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव.

९) प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती-टीएनटी-४.